याच पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीसंबंधीं आलेल्या

# अनेक पत्रांपैकीं कांहीं पत्रें

(१) आपल्या जादूच्या पुस्तकांतले बरेच प्रयोग मी आत्मसात केले. परवां आमच्याकडे पाहुणे आले असतां कांहीं प्रयोग करून दाखविले. प्रयोग सर्वांना आवडले व मलाहि बक्षीस मिळालें. अशींच आणखी बरींच पुस्तकें लिहावींत ही विनंति.

आपला

**कुमार धाकस**

लिमयेवाडी, भावेस्कूल पिछाडी, पुणें २.

* *

(२) मी जात्याच अबोल, पण आपल्या पुस्तकांतले प्रयोग आत्मसात करून लोकांना दाखवूं लागल्यापासून घुमेपणा नाहींसा झाला. हल्लीं शाळेच्या ट्रिप्स व गॅदरिंगसारख्या प्रसंगीं मी अगदीं आघाडीवर असतों.

**खांडेकर**

जोशी हायस्कूल, डोंबिवली

* *

(३) सहज कुतुहल म्हणून आपलें जादूचें पुस्तक विकत घेतलें. म्हटलें म्हातारपणीं जरा करमणूक. पण माझीच नव्हे, तर मी आज अनेक माणसांची करमणूक आपल्या पुस्तकांतील प्रयोगाच्या साहाय्यानें करीत आहें. खडूची करामत, अधांतरीं ग्लास, भांडें गरम करणें, कागद खाऊन लांबच लांब सुरनळी काढणें, भुताचें लिहिणें, चौक छेदणें, दुसऱ्याच्या मनांतले प्रश्न ओळखणें हे प्रयोग पाहून लोक

म्हणतात कीं, मला कर्णपिशाच्च साध्य झालें आहे. असो. पत्र बरेंच लांबलें. कृपा करुन १३ प्रयोगांचें पुस्तक पाठवावें.

आपला

**हरिभाऊ जोशी, सोलापूर**

*  *

(४) नुकतीच सायकलवरून आमची सहल दिल्ली—आग्रा वगैरे भागांत गेली होती. अशा सहलींना नेहमींच मजा येते. मी आपल्या जादूच्या पुस्तकावरून कांहीं प्रयोग साध्य केल्यामुळें तर ही सहल सर्वांच्या चांगलीच स्मरणांत राहिली. जेथें जेथें आमचा मुक्काम होत असे तेथें मी प्रयोग करीत असें. त्यामुळें जेवणाची व राहण्याच्या ठिकाणांची कधींच उणीव भासली नाहीं आणि प्रत्येक गांवीं आम्हांला भरपूर मित्र मिळाले. आणखी अशा प्रकारचीं बरींच पुस्तकें लिहावींत ही विनंती.

**दत्ता गोखले**

महल, नागपूर

*  *

(५) परवां मंगळागौरीच्या रात्रीं मी आपल्या जादूंतील गंमती-जमती या पुस्तकांतले ७।८ प्रयोग केले. सर्वजणींना ते फार आवडले. आमच्या समाजाच्या वाढदिवसानिमित्त मी प्रयोग करावयाचें ठरविलें आहे. तरी आपलीं आणखी कांहीं पुस्तकें असल्यास कळविणें.

**सुनंदा कुंटे**

विलेपार्लें, मुंबई.

*  *

# प्रयोगाआधीं



जादूच्या प्रयोगासंबंधीं माझें हें दुसरें पुस्तक. या पुस्तकाच्या दोन्ही आवृत्या कल्पनेपेक्षां फारच लवकर संपल्या. ' जादूचे आश्चर्यकारक तेरा प्रयोग ' या पहिल्या पुस्तकाची पहिली आवृत्ति फक्त चार महिन्यांत संपली. दुसरी व तिसरी आवृत्तीसुद्धां संपली. यावरुन लोकांना जादूच्या प्रयोगांबद्दल कुतूहल वाटूं लागलें आहे हें सिद्ध झालें.

' जादूंतील गमतीजमती ' या पुस्तकांत जादूचे सोपे पण आश्चर्यकारक असे २५ प्रयोग दिले आहेत. प्रयोग सोप्या भाषेंत आहेतच; शिवाय कांहीं ठिकाणीं चटकन् लक्षांत येण्याकरितां आकृत्याहि दिल्या आहेत.

जादूचे प्रयोग करणें कमी दर्जाचें नाहीं. परदेशांत व्यवसाय म्हणून व छंद म्हणून अनेक लोक जादूच्या प्रयोगांचा अभ्यास करीत आहेत. आपणाकडे मात्र हा विषय दुर्लक्षिला गेला; कारण हा धंदा एका विशिष्ट दर्जाच्या लोकांच्या हातांत होता. हे लोक, ' जादूच्या प्रयोगाकरितां भूत साध्य करुन घ्यावें लागतें, पाण्यांत बसावें लागतें व स्मशानांत जावें लागतें ' असें सांगत. या सर्व कारणामुळें जनतेला जादू व जादूगाराविषयीं एक प्रकारचा तिटकारा वाटूं लागला. मी माझ्या १६ वर्षांच्या अनुभवानंतर आपणांस खात्रीनें सांगू शकतों कीं, जादूगाराला वरीलपैकीं कोणत्याहि गोष्टीची आवश्यकता नाहीं.

इतकेंच नव्हे तर जादू ही अशी एकच कला आहे कीं, ती कोणत्याहि वयाच्या, कोणत्याहि भाषिकांना आणि कोणत्याहि हुद्याच्या

लोकांना सहज समजूं शकते व आवडूं शकते. मी आज लहानमोठे १९ देश, जवळ पैसा नसतांनाहि जादूचे प्रयोग करीत करीत हिंडून आलों व आणखीहि हिंडण्याची इच्छा आहे. असो.

जादूच्या प्रयोगासंबंधीं एक महत्वाची गोष्ट लक्षांत ठेवण्यास हवी. एकादा प्रयोग समजेपर्यंत त्या प्रयोगाबद्दल अतिशय आकर्षण वाटतें. परंतु प्रयोगाचें गुपीत समजतांच त्याकडे दुर्लक्ष केलें जातें. जादूगारानें अशा प्रकारें मनाची चलबिचल होऊं देतां कामा नये. प्रयोग साधा असला तरी तो जास्तींत जास्त आकर्षक पद्धतीनें प्रेक्षकांसमोर मांडण्याचा प्रयत्न करण्यास हवा आणि असें केलें तरच जादूगार आपल्या कलेंत वाकबगार व कल्पक बनूं शकेल.

वरील गोष्टींप्रमाणेंच या शास्त्राविषयीं जादूगारांच्या जागतिक संघटनेनें आणखी कांहीं नियम केले आहेत. ते स्मरणांत ठेवण्यास हवेत. हे नियम पुढीलप्रमाणें आहेत.

(१) दुसऱ्या जादूगाराचे प्रयोग स्टेजवर चालूं असतां, मी प्रयोगांचीं गुपितें फोडून जादूगाराची फजिती करणार नाहीं. उलट त्याला शक्य ती मदत करीन.

(२) जादूच्या प्रयोगांना दैवी सामर्थ्याचें पांघरुण घालून भोळ्या लोकांना ताइत, गंडे अगर तस्मम वस्तू देऊन फसविणार नाहीं.

(३) सर्वसामान्य माणसांत जादू व जादूगाराविषयीं जो गैरसमज आहे तो घालविण्याचा व जादूची महती वाढविण्याचा मी मनापासून प्रयत्न करीन.

हे नियम पाळले असतां सर्वांचाच फायदा होणार आहे. कारण त्यामुळें प्रयोगांचीं गुपितें सर्वांच्या तोंडीं होणार नाहींत व सर्व जादूगारांत एक प्रकारचा स्नेहभाव वाढेल.

जातां जातां एक गोष्ट लक्षांत असूं द्या. कोणत्याहि जादूच्या पुस्तकांतले प्रयोग जादूगार नसलेल्या माणसांना चटकन् समजत नाहींत. म्हणून प्रत्येक प्रयोग **तीन चार वेळां वाचून व विचार करून बसवावा. प्रथम प्रत्येक प्रयोगाची घरीं संवय करून नंतर तो आपल्या चार मित्रांना करून दाखवावा. त्यामुळें आत्मविश्वास उत्पन्न होतो.** शेवटीं न डगमगतां स्टेजवर प्रयोगांना सुरुवात करावी. प्रयोग करीत असतांना एकादा प्रयोग फसला तर न गांगरतां चटकन दुसऱ्या प्रयोगाला सुरुवात करुन प्रेक्षकांचें लक्ष दुसरीकडे वेधण्यांत जादूगाराचें कसब आहे.

या पुस्तकांतला एखादा प्रयोग आपणांस समजला नाहीं तर मला लिहा अगर पुण्यांत याल तेव्हां अवश्य भेटा. मी आपल्या सेवेस सदैव तयार आहें.

जादूगार रघुवीर

१५ जानेवारी १९५७

भारतीय जादूची शाळा
१९२३ सदाशिव, माडीवाले कॉलनी पुणें २

# अनुक्रम

# जादूंतील गमतीजमती

**प्रयोग नं. १ रंगीत कागद :**—रंगीत कागदाचे तुकडे खाऊन लांबच लांब सुरनळी बाहेर काढणें. हा प्रयोग आत्तांपर्यंत अनेक जादूगारांनीं केलेला आपण पाहिला असेल व तो आपणांस आवडलाहि असेल. लहान मोठ्यांना या प्रयोगाविषयीं आश्चर्य वाटतें असा माझा अनुभव आहे.



**साहित्य :**—रंगीत कागदाचे लहान लहान तुकडे एका टोपींत ठेवावेत. त्याप्रमाणें रंगीबेरंगी कागदाच्या पट्ट्या एकमेकांस चिकटवून बंडल तयार करावें. बंडल तयार झालें कीं काड्याच्या पेटींतल्या काडीनें चित्र नं १ मध्यें दाखविल्याप्रमाणें, मधला भाग थोडा वर ओढून काडी काढून टाकावी. अशा प्रकारें तयार केलेलें बंडल प्रयोग करण्यापूर्वी टोपींतील तुकड्यांत मिसळून भाषणास सुरुवात करावी.

**थोडक्यांत भाषण :**—शाळेंत असतांना एकदां आमची ट्रिप गेली होती कागदाची गिरणी पहावयाला. मला जादूचे प्रयोग येतात हें मॅनेजरला समजलें. त्यांनीं प्रयोग करण्याविषयीं अतिशय आग्रह केला. मी प्रथ नेहमींप्रमाणें थोडे आढेवेढे घेतले व नंतर लगेच गिरणींतलि नवीन कापलेल्या कागदाच्या पट्ट्या खायला



सुरुवात केली (कागद खाण्यास लागावें). सर्वांना आश्चर्य वाटलें. (भाषण येथेंच थांबवून कागद खात राहावें). तोंडांत घातलेल्या कागदाच्या तुकड्यांची चावल्यानंतर जी बारीक **गोळी तयार होईल ती दुसरा घास घेतांना हळूंच जिभेनें ढकलून** हातांत घ्यावी. त्याचप्रमाणें **शेवटच्या घासाच्या वेळीं ठेवलेलें** बंडल तोंडांत **घालावें.** मधला लांबट भाग बाहेर आढून जरा थांबावें व नंतर हळू हळू ओढण्यास सुरुवात करावी. इकडे तिकडे जलद रीतीनें हिंडावें. मध्यें थोडें थांबून परत कागद ओढण्यास लागावें. शेवटीं सर्व बंडल संपल्यावर जादूगारानें दुसऱ्या प्रयोगाकडे वळावें.

**प्रयोग नं. २ :–जादूची अजब कांडी.**

एका लिफाफ्यांत घातलेली जादूची कांडी गुप्त होऊन दुसरीकडे निघते.

**साहित्य**–जादूची कांडी, कांडीच्या उंचीपेक्षां थोडे जास्त उंचीचे दोन लिफाफे (कागदाचीं पाकिटें), त्याचप्रमाणें जादूच्या कांडीवर काळा कागद गुंडाळून ठेवावा. **मात्र हा कागद अशा तऱ्हेनें गुंडाळावा कीं, कागदाच्या गुंडाळींतून जादूची कांडी सहज निघूं शकेल व कागदाची नळी कांडीप्रमाणें दिसेल.**

**कृति**–प्रथम दोन मोकळे लिफाफे प्रेक्षकांना दाखवून दोन खुर्च्यांवर उभे ठेवावे. त्याचप्रमाणें कागदाच्या सुरनळीसकट, जादूची कांडी एकदां टेबलावर बोलतां बोलतां आपटून दाखवावी, म्हणजे कांडी पोकळ आहे वगैरे संशय उत्पन्न होणार नाहींत. यानंतर लिफाफे नीट करण्याच्या निमित्तानें कागदयुक्त जादूची कांडी लिफाफ्यांत घालावी. जरा हलविल्यासारखें करून कागदांतील कांडी हळूंच लिफाफ्यांत सोडून द्यावी व कांडीवर गुंडाळलेली कागदाची

( कांडीप्रमाणें दिसणारी ) सुरनळी वर काढावी व दुसरा लिफाफा नीट करून ' ही जादूची कांडी मी याच लिफाफ्यांत ठेवतों ' असें सांगून कागदाची सुरनळी लिफाफ्यांत ठेवावी. नंतर थोडें भाषण करून सुरनळी ठेवलेला लिफाफा एक, दोन, तीन म्हणतांच दोन्हीं हातांनीं एकदम चुरगळावा. कांडी नाहींशी झालेली पाहून प्रेक्षकांना आश्चर्य वाटेल. नाहींशी झालेली कांडी पहिल्या लिफाफ्यांतून निघा-लेली दाखवावी.

थोडक्यांत भाषणः—पूर्वी एक फकीर एका खोलींत कोंडून ठेवला असतां दुसऱ्या खोलींतून बाहेर येत असे. सध्यां तो फकीर नसला तरी त्याची ही जादूची कांडी मात्र मला एके ठिकाणीं मिळाली आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे या कांडींतहि तो गुणधर्म आहे. आतां पहा ना, हे दोन लिफाफे म्हणजे दोन खोल्या समजूं इत्यादि. ( भाषणांत आपल्या मताप्रमाणें फरक करून विनोद निर्माण करण्याचा प्रयत्न करावा. एक दोन प्रयोगांनंतर ही गोष्ट आपोआप साध्य होईल. )

## प्रयोग नं. ३ः— पाण्याची शाई

रिकाम्या ग्लासांत पाणी ओततांच शाई बनते.

**साहित्यः**—एका ट्रेमध्यें तीन काचेचे ग्लास ठेवावेत व त्यांपैकीं दोन ग्लासांत टिंचर फेरी पर क्लोराईड दोन दोन थेंब टाकावें. त्याचप्रमाणें कांचेच्या एका मोठ्या भांड्यांत पाणी घेऊन त्यांत चमचाभर टॅनिक ॲसिड घालून तें पूर्णपणें विरघळूं द्यावें. हा प्रयोग सुरू करण्याअगोदर प्रेक्षकांना सर्व ग्लास रिकामे आहेत हें दाखवावें. नंतर भांड्यांत तयार करून ठेवलेलें पाणी क्लोराईड नस-लेल्या तिसऱ्या ग्लासांत प्रथम ओतावें. हें पाणी आत्तांच नळाचें

आणलें आहे असें सांगावें. तेंच पाणी क्लोराईड टाकलेल्या ग्लासांत ओततांच त्याची शाई तयार होईल व परत तिसऱ्या ग्लासांत ओततांच आणखी ग्लासभर शाई तयार होईल.

थोडक्यांत भाषण :—

एकदां फिरतीवर असतांना एका गृहस्थाला शाईची जरूरी भासली. परंतु शाई कोठेंच मिळेना. शाई मिळत नाहीं ही बातमी मला समजतांच अशा तऱ्हेनें त्याला शाईच शाई तयार करून दिली.

**(प्रयोगास लागणारीं द्रव्यें कोणत्याहि डॉक्टरकडे अगर केमिस्टकडे मिळतील. तीं विषारी नाहींत.)**

**प्रयोग नं. ४:—नोट जाळून पुन्हा तयार करणें.**




प्रेक्षकांनीं सही केलेली आणि नंबर टिपून घेतलेली नोट जादूगार जाळतो व ती पावांतून काढून दाखवितो.

**साहित्यः**—एक मोठा पाव, कोरें कागदी पाकीट. पाकिटाला चित्रांत दाखविल्याप्रमाणें नोट सहज जाऊं शकेल अशी एक चीर मध्यभागीं पाडावी. हें अगोदरच टेबलावर तयार ठेवावें. या प्रयोगाला साथीदाराची आवश्यकता आहे.

**कृतिः**—प्रथम प्रेक्षकांपैकीं एकाची नोट घेऊन तिच्यावर त्यालाच सही करण्यास व नंबर टिपून घेण्यास सांगावें. नंतर ती नोट घेऊन पाकीटांत घालावी. पाकीटाला चीर असल्यामुळें त्या चिरेमधून नोट जादूगाराचे हातांत येईल. नोट तशीच हातांत ठेऊन पाकीट चिकटवावें आणि एका लहान मुलाच्या हातांत द्यावें. टेबला-

वरील काच्याची पेटी घेण्याच्या निमित्तानें टेबलाजवळ जावें व नोट टेबलावर ठेवून काच्याची पेटी घेऊन यावें. पाकीट जाळावें. प्रेक्षकांना वाटतें कीं पाकीटांतली नोटहि जळून गेली. ही कृति चालू असतांना साथीदार टेबलावरची नोट पावांत घालून ठेवतो. पाव खालच्या बाजूनें मऊ असल्यामुळें नुसत्या बोटानें सुद्धां नोट आंत घालतां येते. साथीदार तयार पाव टेबलावर ठेवतो. पाकीट जाळून झाल्यावर टेबलावरील नोट घालून ठेवलेला पाव हातांत घेऊन मुलाला पाकीटाची राख पावावर फुंकण्यास सांगावें. यानंतर सुरीनें पाव कापतांच प्रेक्षकांना पावांतून नोट निघालेली दिसेल. नोटेवरचा नंबर व सही पाहून प्रेक्षक आश्चर्यानें तोंडांत बोट घालतील.

थोडक्यांत भाषण—एकदां एका जादूगाराच्या घराला आग लागली; पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्या आगीनें जादूगाराचें कांहींहि नुकसान झालें नाहीं. उलट जादूगाराची मालमत्ता सुरक्षित राहिलेली पाहून आजूबाजूच्या लोकांना आश्चर्य वाटलें. पाहिजे तर आपणाला गंमत म्हणून एक प्रयोग करून दाखवितों. मला एका नोटेची आवश्यकता आहे. अर्थात नुसती नोट नको; तर तिचा नंबर आपण टिपून घ्या व तिच्यावर सही करून ती मला द्या. ( नंतर प्रयोगास लागावें. )

### प्रयोग नं. ५:—हुकमी गोळा

हा गोळा जादूगाराचे हुकूम मानतो व जादूगार सांगेल त्या ठिकाणीं थांबतो.

**साहित्य**—एक रंगीत लाकडी गोळा. त्याला चित्रांत दाखविल्याप्रमाणें ( नं. १ ) भोक पाडावें व त्यांतून सहज सरकेल अशी जाडसर रंगीत दोरी ओवून घ्यावी.



दोरी सैल सोडली असतां गोळा इकडे तिकडे सरकूं शकतो. मात्र दोरी उभी धरून जरा ताठ केल्यास गोळा थांबतो. (नं. २ च्या चित्रांत दाखविल्याप्रमाणें.) अगदीं किंचित सैल केली असतां परत खालीं जाऊं लागतो. लहान मुलांना हा प्रयोग फार आवडतो.



चित्र नं. १

चित्र नं. २






### प्रयोग नं. ६:–भुताचें लिखाण

जादूगार प्रेक्षकांपैकीं कांहीं लोकांना चिठ्ठया देतो व त्यावर कोणत्याहि देवाचें अगर माणसाचें नांव लिहिण्यास सांगतो. सर्व चिठ्ठया बशींत एकत्र करून एका लहान मुलास बशींतील एक चिठ्ठी उचलण्यास सांगतो. मुलगा चिठ्ठींतलें नांव वाचून तें एका पाटीवर लिहून पाटी प्रेक्षकांना दाखवून खुर्चीवर ठेवतो. नंतर जादूगार मुलाजवळची चिठ्ठी घेऊन जाळतो व राख आपल्या डाव्या हाताचे मनगटावरील भागावर चोळतो. राख चोळतांच मुलानें पाटीवर लिहिलेलें नांव उमटतें. प्रेक्षकांनीं लिहिलेलें नांव अशा तऱ्हेनें हातावर उमटलेलें पाहून गम्मत वाटते.

**साहित्य व तयारी :**—या प्रयोगाला एका गुप्त साथीदाराची आवश्यकता आहे. तो साथीदार प्रेक्षकांत बसलेला असतो. जादूगारानें दिलेल्या चिठ्ठ्या लिहून झाल्यावर त्या बशींत गोळा केल्यावर सर्व चिठ्ठयापैकीं एक चिठ्ठी उचलण्यास एक मुलगा येतो. तोच साथीदार असतो. साथिदार अगोदर ठरविलेलें नांव वाचतो व पाटीवर लिहून प्रेक्षकांना दाखवून पाटी खुर्चीवर ठेवून देतो. नंतर जादूगार ती चिठ्ठी घेऊन जाळून तिची राख हातावर चोळतो. जादूगारानें अगोदरच आपल्या हातावर ठरविलेलें नांव साबणाच्या पाण्यानें लिहून ठेवलेलें असतें. हें लिखाण वाळल्यावर दिसत नाहीं. मात्र राख चोळतांच दिसूं लागतें.

थोडक्यांत भाषणः—हा भुताच्या लिखाणाचा प्रयोग प्रत्येक वेळीं यशस्वी होतो असें नाहीं. कारण या प्रयोगाला अत्यंत शांतता लागते. परंतु आजचे प्रेक्षक अतिशय शांत व कलेचे भोक्ते असल्यामुळें हा प्रयोग यशस्वी होईल असें वाटतें. आतां कृपा करून या कागदाच्या तुकड्यावर आपल्या आवडत्या माणसाचें अगर देवाचें नांव लिहा. नांव लिहून झाल्यावर चिठ्ठया या बशींत टाका.

## प्रयोग नं. ७:—अस्मानी फूल

जादूची कांडी कोटावर फिरवितांच जादूचें फूल जादूगाराचे कोटावर आपोआप येऊन बसतें.

**साहित्य व तयारीः**—एक कागदाचें सुंदर फूल तयार करावें व त्याच्या देठाला इलॅस्टिक किंवा रबराचा धागा बांधावा. प्रथम रबरी धागा कोटाच्या काज्यांतून ओवून घेऊन तो कोटाचे आंतील बाजूस सुईनें शिवून ठेवावा. नंतर फूल ओढून घेऊन कोटाचे आंत खाकेंत दाबून धरावें. थोडें भाषण केल्यावर जादूगारानें कोटावर कांडी फिरवून खाक सैल करावी. रबरी धाग्यामुळें फूल चटकन

काज्यावर येऊन बसेल. एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवण्यास हवी कीं, रबरी धाग्याची लांबी जास्त नसावी; लांबी जास्त असेल तर फूल काज्यावर लोंबकळत बसेल. तरी धागा लहान घेऊन तो ताणून फूल खाकेंत धरावें. साधारणपणें हा प्रयोग सुरवातीला करावा; कारण अगोदर इतर प्रयोग केले तर खाक सैल पडून फूल अगोदर कोटावर येऊन बसेल.

थोडक्यांत भाषण—ही जादूची कांडी जादूगाराजवळ असली कीं, जादूगार काय वाटेल तें करूं शकतो अशी लोकांची समजूत आहे. अर्थात ती खोटी नाहीं. आजच पहा ना, मी सर्व वस्तू आणल्या; पण कोटाला लावण्याकरतां फूल आणावयाचें विसरलों. बागेंत गेलों; पण फुलेंच नव्हतीं. कांहीं हरकत नाहीं. आतां हा जादूची कांडी माझ्या कोटावरुन फिरवतांच फूल तयार होईल.

(**टीप:**—कोटाचा रंग जसा असेल तशाच रंगाचा धागा मिळाल्यास फार बरें. धागा न मिळाल्यास सायकलच्या काळ्या टयूबच्या रबराची लहान पट्टी वापरल्यास चालेल.)

## प्रयोग नं. ८:—हाताखालचा रुपया

मांडीवर रुपया ठेवून त्यावर तळहात दाबल्यास रुपया जागचे जागीं नाहींसा होतो.

**साहित्य व तयारी:**—मागच्या प्रयोगांत फूल उत्पन्न कसें होतें याची कल्पना दिली. अगदीं त्याच्या विरुद्ध प्रकारानें हा रुपया नाहींसा करतां येतो. एक रुपया अगर मोठा पैसा घेऊन त्याला सॉडरवाल्याकडून एक लहान (सेफ्टी) पीन सॉडर करुन घ्यावी. रबरी धाग्याचें एक टोंक खांद्याजवळ कोटास आंतील बाजूस शिवावें व लांबी बेताची ठेऊन दुसरें टोंक पिनला बांधून ठेवावें. प्रयोगाआधीं रुपया कोटाचे बाहींत रबरी धाग्याला लोंबकळत असतो.



प्रयोग करण्याअगोदर बोलता बोलता व कोट नीट करण्याचे निमित्तानें रुपया मुठींत धरावा. मुठींत धरलेला रुपया प्रक्षकांना रबरी धागा दिसूं न देतां दाखवावा व नंतर तो मांडीवर ठेऊन तळहात त्यावर दांबावां ( चित्र पहा ). तळहात दाबतांना मनगटाकडची बाजू जरा उचलावी. मनगट थोडें उचलतांच रुपयां सटकून कोटाचे बाहींत जाईल. नंतर हात रिकामा दाखवावा.

**थोडक्यांत भाषणः**—जादूगार जशा कांहीं वस्तू उत्पन्न करतो, तशाच तो कांहीं नाहींशाहि करुं शकतो. एका जादूगारानें तर स्टेजवरुन टेबलच नाहींसें केलें व टेबल नाहींसें झालें म्हणून त्यानें पुढें एकहि प्रयोग न दाखवितां स्टेज सोडलें; पण मला आपणांस आणखी कांहीं प्रयोग दाखवावयाचे आहेत. म्हणून हा रुपयाच नाहींसा करतों.

## प्रयोग नं. ९ः—बत्तासा अगर खडीसाखरेला आग.

जादूगार **बत्तासा** अगर खडीसाखरेचा एक खडा घेतो व प्रेक्षकांपैकीं एकाला बोलावून खड्याला जळत्या काडीनें आग लावण्यास सांगतो; पण प्रेक्षकाला खडा पेटवितां येत नाहीं. शेवटीं जादूगार

काडी ओढून खड्याला लावतांच तो पेट घेऊन जळूं लागतो.

साहित्य व तयारीः—एक खडीसाखरेचा खडा किंवा बत्तासा, सिगारेटची थोडी राख, काड्याची पेटी. शक्य तों बत्तासा घ्यावा.

कृतिः—प्रेक्षकांनीं जळती काडी लावल्यावर न पेटणारा खडा जादूगारानें काडी लावतांच पेटतो. याचें मुख्य कारण म्हणजे सिगारेटची राख होय. प्रेक्षकांनीं काडी लावून जळत नसलेला खडा जादूगारानें हातांत घ्यावा व त्याला सिगारेटची राख बोलतां बोलतां चोळावी. ही राख अशा तऱ्हेनें चोळावी कीं प्रेक्षकांना वाटलें पाहिजे, जादूगार खडा साफ करीत आहे. (प्रयोगाअगोदरच राखेची चिमूट टेबलावर ठेवलेली असावी.) राख चोळून होतांच काडी लावली असतां खडा आपोआप पेटूं लागतो.

थोडक्यांत भाषणः—आतांपर्यंत मी बरेंच प्रयोग केले. कांहीं वस्तू उत्पन्न केल्या, तर कांहीं गुप्त करुन दाखविल्या. या प्रयोगांत मी न जळणाऱ्या वस्तूला आग लावणार आहें. कशाला बरें आग लावावी ? (खिसे चाचपून) हं सांपडला, आज एकानें देवाचा प्रसाद म्हणून खडीसाखरेचा खडा दिला आहे. त्यालाच आग लावतों झालें. पण त्याअगोदर एका प्रेक्षकाची आवश्यकता आहे. हं, या; आपण आलांत तरी चालेल. आतां ही काडी ओढून खड्याला लावा. नाहीं ना पेटत ? ठीक. आतां मी याला जरा साफ करतों व नंतर काडी लावतों.

## प्रयोग नं. १०

## अजब इच्छाशक्ती किंवा नाकाची अजब शक्ती

जादूगार प्रेक्षकांजवळच्या निरनिराळ्या २०।२५ वस्तू मागून

घेतो. त्या एका स्टुलावर ठेवतो. प्रेक्षकांपैकीं एकाला बोलावून त्याला सांगतो कीं, मी बाहेर गेल्यावर कोणत्याहि चार-पांच वस्तू उचलून प्रेक्षकांना दाखवून जागचे जागीं ठेवा. मी त्या वासावरून ओळखून दाखविण्याचा प्रयत्न करीन.

**साहित्य व तयारी :**—प्रेक्षकांजवळच्या निरनिराळ्या वस्तु मागून घ्याव्यात. पेन, कंगवा, बटन, क्लीप, बॅटरी इत्यादि. सहसा भारी किंमतीच्या वस्तू घेऊं नयेत, कारण एकादे वेळीं कांहीं कारणानें वस्तू गहाळ झाल्यास जादूगारावर ठपका येतो. ( एकदां प्रयोग करीत असतांना रात्रीं दिवे गेले व एका माणसाचें घड्याळ टेबलावरुन नाहींसें झालें. असा माझ्या एका जादूगार मित्राचा अनुभव आहे. ) सर्व वस्तू स्टुलावर अगर लहान टेबलावर मांडल्यानंतर आपण बाहेर जावें व प्रेक्षकांपैकीं एकाला फक्त ४।५ वस्तू उचलून ठेवण्यास सांगावें. या प्रयोगाला साथिदाराची आवश्यकता आहे. आपला साथिदार प्रेक्षकांत बसलेला असावा. प्रेक्षकांपैकीं एकानें उचललेल्या वस्तू साथिदाराला दिसलेल्या असतात. जादूगार स्टेजवर आल्यावर एकेक वस्तू उचलून वास घेऊं लागतो. आपला साथिदार प्रेक्षकांत बसलेला असतो व तो संकेत देतो. संकेत देण्याचे अनेक प्रकार आहेत. साथिदार आपला डावा हात गालावर ठेवून बसतो. त्याचीं सर्व बोटें चिकटलेलीं असतात. जर वस्तूला हात लावला नसेल तर तो फक्त आपली करंगळी वेगळी करतो व हात लावला असेल तर सर्व बोटें चिकटवून ठेवतो. या खुणेशिवाय आणखीहि खुणा आहेत. हा प्रयोग यापेक्षांहि सोपा करतां येतो तो असा. वस्तूंना हात लावण्यास आपला साथिदार येतो व तो अगोदर ठरवून ठेवलेल्या वस्तूंनाच हात लावतो. हा प्रयोग प्रथम जरी साधा वाटला तरी या प्रयोगानें मोठमोठे विद्वान थक्क होतात.

**थोडक्यांत भाषण :**—अनेक लोकांच्या जवळ अनेक प्रकारची शक्ति असते. कोणी योगाचे साहाय्यानें जमिनींत पुरुन घेतो, तर कोणी गुप्त धन सांगतो किंवा कोणी मंत्रानें सापाचें विष उतरवितो. मी मात्र यापैकीं कांहींच करणार नाहीं. मी । नाकाची शक्ती आपणांस दाखविणार आहें. आपण आपल्या जवळच्या लहान मोठ्या २०।२५ वस्तू या टेबलावर ठेवण्यास द्या. मात्र एकाच प्रकारच्या दोन वस्तू नसाव्यात. वस्तू ठेवून झाल्या कीं, मी बाहेर जाईन व आपणापैकीं कोणीहि येऊन कोणत्याहि पांच वस्तूंना हात लावून जावें. मी नुसता वास घेऊन त्या ओळखून दाखविण्याचा प्रयत्न करीन.

## प्रयोग नं. ११ :—खोडकर पेन्सिल

शेजारच्या चित्रांत दाखविलेली पेन्सिल प्रेक्षकांपैकीं एकजणाच्या



कोटाच्या काज्यांत अडकविली असतां ती कितीहि प्रयत्न केला तरी निघत नाहीं. पेन्सील काढण्याची अट—(१) पेन्सीलीला असलेल्या धाग्याची गांठ सोडावयाची नाहीं व पेन्सील मोडावयाची नाहीं. (२) धागा कापावयाचा नाहीं.

पेन्सीलीकडे नीट पहा. तिच्या धाग्याची लांबी आखूड असल्यामुळें ती त्यांतून निघणें अशक्य आहे आणि याच गोष्टीमुळें प्रेक्षकांनीं कितीहि प्रयत्न केला तरी पेन्सील निघणार नाहीं. परंतु जादूगार मात्र ती चटकन् काढूं शकेल.

पेन्सील अडकविण्याची व काढण्याची रीत :—

प्रथम पेन्सीलीच्या दोरीच्या वर्तुळांत आपल्या उजव्या हाताचीं पांचहि बोटें अडकवा. पेन्सील खालीं लोंबकळत राहूं द्या.

पेन्सील असलेल्या हाताच्या पांच बोटांनीं ज्या काड्यांत पेन्सील अडकवावयाची आहे तो काजा धरा. आतां हातावरची दोरी कोटावर पडूं द्या. नंतर काड्यांचा भाग वर उचलून दोरी खालीं सरकवा. ती इतकी खालीं सरकवा कीं, पेन्सीलची आणि वर ओढलेल्या भागाची लांबी सारखी भरेल. नंतर पेन्सील काड्यांत ओवून चटकन बाहेर काढा. पेन्सील बाहेर काढतांच दोरीला तिढा बसलेला दिसेल. अशा तऱ्हेनें बसविलेली पेन्सील बाहेर काढतां येणार नाहीं. पेन्सील काढतांना वरील क्रिया उलट प्रकारें करावी म्हणजे पेन्सील काढतां येईल. साध्या पेन्सीलीला भोंक पाडून प्रयोगाला लागणारी पेन्सील तयार करतां येईल.

**प्रयोग नं. १२:–अंगठी क्षणांत गुप्त होऊन फळांतून निघते.**

जादूगार प्रेक्षकांकडून एक अंगठी मागून घेतो. ती रुमालांत गुंडाळून एका मुलाजवळ देतो. एक, दोन, तीन, म्हणून रुमाल झटकतांच अंगठी गुप्त झालेली दिसते व ती टेबलावरील मोसंबीं अगर तत्सम फळांतून निघते.

**साहित्य व तयारी:**—मोसंबीं, रुमाल व एक अंगठी. प्रथम एक अंगठी रुमालाच्या कोपऱ्यांत शिवून ठेवावी. चित्र पहा.



अंगठी अशा तऱ्हेनें शिवावी कीं प्रेक्षकांना दिसणार नाहीं. अगोदर टेबलावर असलेल्या मोसंब्याला देठा-पाशीं भोंक पाडून तयार ठेवावें. प्रेक्षकांकडून मागून घेतलेली अंगठी रुमालांत गुंडाळतांना आपल्या तळहातांत ठेवावी व शिवलेली अंगठी गुंडाळून एका मुलाजवळ

द्यावी. मुलाला विचारावें कीं, अंगठी आहे ना? नीट धरून ठेव व प्रेक्षकांचे मागें जाऊन उभा रहा. इतक्यांत जादूची काठी घेण्याचे निमित्तानें टेबलाजवळ जावें व अंगठी चटकन मोसंब्याच्या भोकांत दाबावी. काठी घेऊन यावें व मुलाला परत स्टेजवर येण्यास सांगावें. मुलगा आल्यावर रुमालांतील अंगठीवरून जादूची काठी फिरवावी. रुमालाचें टोक धरून हवेंत झटकावें. रुमाल झटकतांच अंगठी नाहींशी झालेली दिसेल. नंतर मोसंबीं घेऊन भोक पडलेली बाजू मागें करून कापावें. मोसंबीतून अंगठी निघतांच प्रेक्षक थक्क होतील. मोसंबीत अंगठी घालण्याकरतां साथीदार असेल तर फारच बरें.

## प्रयोग नं. १३:—तीन चोरांची सुटका

दोन दोऱ्यांत ओवलेले तीन रंगीत लाकडी गोळे दोन्ही टोकांना दोन प्रेक्षकांनीं धरले असतां आपोआप बाहेर येतात.

चित्र नं. १



**साहित्य व तयारीः**—आरपार भोक असलेले तीन लाकडी रंगीत अगर साधे गोळे. ६ फूट लांबीच्या दोन दोऱ्या. दोऱ्याची जाडी फार नसावी. दोन्ही दोऱ्या एकत्र करून गोळ्यांच्या भोकांत ओवल्या असतां गोळे सहजतेनें सरकले पाहिजेत.

**कृतिः**—हा प्रयोग मोठमोठ्या युक्तिबाजांना तोंडांत बोट घालायला लावणारा असला तरी कृति मात्र सोपी आहे. पुढील चित्राकडे पाहिल्यास तें आपल्या चटकन लक्षांत येईल. प्रथम दोन्ही



दोऱ्या सारख्या करून त्या जोडून घेऊन मध्यभागीं एका साध्या दोऱ्यानें

चित्र नं. २

गाठ मारावी. दोरा दुहेरी घेऊं नये. गाठ मारून झाल्यावर प्रत्येक दोरीचीं दोन्ही टोकें एकत्र करावीं. मध्यभागीं चित्र नं. २ मध्यें दाखविल्याप्रमाणें दिसेल. इतकें करून झाल्यावर दोरींत गोळे ओवावेत. प्रयोगाचे वेळीं प्रेक्षकांना दाखवितांना दोरीच्या टोकाकडचा भाग ओढून भक्कम आहे कीं नाहीं हें पाहण्यास सांगावें. नंतर दोन प्रेक्षकांच्या जवळ दोरीचीं दोन्ही टोकें द्यावींत. म्हणावें, यांतून गोळे निघणें शक्य नाहीं; तरी पण प्रयोग जास्त कठीण करण्याकरतां म्हणून आपण एक गाठ मारूं या. प्रत्येक प्रेक्षकाच्या जवळ असलेल्या दोन टोकांपैकीं कोणतेंही एक घेऊन त्याची फक्त एक गांठ चित्र नं. १ मध्यें दाखविल्याप्रमाणें मारून दोऱ्या परत हातांत द्याव्यात. नंतर प्रेक्षकांना सांगावें कीं ज्या वेळीं मी एक, दोन, तीन म्हणून गोळ्यावर जादूची कांडी मारीन त्या वेळीं दोघांनीं दोन्ही बाजूस ओढावें आणि आश्चर्य म्हणजे तीन म्हणतांच गोळे खालीं पडतील. (हा प्रयोग चित्राच्या सहाय्यानें नीट समजावून घेऊन करावा.)

**थोडक्यांत भाषण :—**पूर्वींच्या काळीं तीन प्रसिद्ध दरोडेखोर होते. त्यांना पोलिसांनीं कितीही कडक पहाऱ्यांत ठेवलें तरी ते तेथून आपली सुटका करून घेत इत्यादि.

## प्रयोग नं. १४:—रुमालांतील पीन

रुमालांत अडकविलेली पीन न उघडतां आपोआप इकडून तिकडे भ्रमण करते आणि रुमालहि फाटत नाहीं.

**साहित्य व तयारीः**—एक कापडी हातरुमाल व एक सेफ्टी पीन.

ह्या प्रयोगास थोड्या सफाईची आवश्यकता आहे. कोठेंहि कोणालाहि करतां येण्यासारखा हा प्रयोग असल्यामुळें मित्र-मंडळींत दाखविण्यास फारच उत्तम. ( या प्रयोगाला सिल्कचा रुमाल वापरूं नये. )

प्रथम एका गृहस्थाला पीन व रुमाल तपासण्यास द्यावा. त्यांत कांहींहि खास गोष्ट नसल्याची खात्री करून घेण्यास सांगावें. नंतर रुमाल आपल्या हातांत घेऊन एका टोकांत पीन टोचून ती बंद करण्यास सांगावी ( चित्र पहा. ) नंतर त्यांना सांगावें कीं आपण जरी येथें पीन टोचून बंद केली असली तरी ती येथें टोकांत नसून मध्यभागीं आहे. असें म्हणतांच पीन सरकवावी. पीन न उघडतां सरकविण्याची खुबी म्हणजे पीनचा मागचा भाग ( गोल भोक असलेला ) दोन बोटांत धरून पीनची उघडझाप होणारी बाजू ज्या बाजूस पीन सरकवावयाची असेल त्या बाजूस करावी व आपलीं बोटें रुमालास लागतील अशीं धरून पीन रुमालाला लावून ( ज्या ठिकाणीं चित्रांत 'बाजू' शब्द दिसतो तेथें रुमालाच्या कडेच्या मध्यभागीं ) ओढल्यास ती आपोआप न उघडतां पुढें सरकते. रुमालाचें एक टोक आपण धरावें व दुसरें एका मित्रास धरण्यास सांगावें.



## प्रयोग नं. १५ :—मी वर्तुळ तयार करतों

सहा पैसे (एका आकाराचे) घेऊन चित्रांत दाखविल्याप्रमाणें मांडावें व कोणतेहि पैसे फक्त तीन वेळां हलवून वर्तुळ तयार करण्यास सांगावें. मात्र प्रत्येक पैसा ठेवतांना **त्याचा दोन पैशास स्पर्श झाला असला पाहिजे.** एक पैसा काढीत असतांना **दुसरा हलतां कामा नये.** पैशांना **तीन वेळेपेक्षां जास्त वेळां स्पर्श करतां येणार नाही.**

**साहित्य व तयारी :**—हाहि प्रयोग मित्रमंडळींत दाखविण्यास योग्य आहे. प्रथमदर्शनी अगदीं सोपा दिसला तरी तो वाटतो तितका सोपा नाहीं. मात्र वरील नियम लक्षांत ठेवण्यास हवेत.

१ ४ २ ५ ३ ६

**खुबी**—चित्रांत दाखविल्याप्रमाणें पैसा मांडा. प्रथम आपण खालीं सांगितलेल्या रीतीप्रमाणें आपल्या मित्रांना वर्तुळ तयार करून दाखवा व नंतर त्यांना करण्यास सांगा. पहा त्यांना किती वेळ लागतो तो.

या प्रयोगांत पैसे हलविण्यास सुरुवात कोठून करावयाची तें महत्त्वाचें आहे. सुरुवात दोन ठिकाणांहून करतां येते. आपण नं. ३ अगर नं. ४ चा पैसा हलवूं शकतां. थोडें बारकाईनें पाहिल्यास लक्षांत येईल कीं, हीं दोन्हीं टोकें आंतल्या बाजूस आहेत. आतां आपण नं. ३ पासून सुरवात करूं. नं. ३ चा पैसा सरकवून तो नं. १ व २ यांना लावून ठेवा. नंतर नं. २ चा पैसा सरकवून तो त्याच

बाजूस ५ व ६ यांना लावा. नंतर ६ नंबरचा पैसा सरकवून २ व ३ यांना लावल्यास वर्तुळ तयार झालेलें दिसेल. त्याप्रमाणें नं. ४ पासून सुरवात करुनहि वर्तुळ बनवितां येईल. आपण एकदां करुन दाखविलें असूनहि आपल्या मित्रांना तें निश्चितपणें जमणार नाहीं. मात्र त्यांना कधींहि गुपित सांगूं नका.

## प्रयोग नं. १६ :—चौक छेदा



शेजारच्या आकृतीप्रमाणें आकृति काढा. तिला चांदणी अगर स्टार म्हणतां येईल.या चांदणीला एकंदर १० छेदबिंदू आहेत. पांच आंत व पांच टोकांना. आपण कोणत्याहि बिंदूपासून सुरवात करुं शकतां. **प्रथम** जेथून **सुरवात कराल** तेथून **सरळ रेषेंत** तिसऱ्या बिंदूवर फुली करावयाची. मात्र **छेदलेल्या बिंदूपासून परत सुरुवात करतां येणार नाहीं.** वरील नियम पाळून एक बिंदू सोडून सर्व बिंदू छेदून दाखवा.

हा प्रयोग लिहितां वाचतां येणाऱ्या लोकांनाच समजेल. इतरांना तो दाखविण्याच्या भानगडींत पडूं नका. भूमितीमध्यें पहिला नंबर आलेल्या माणसांना सुद्धां हा प्रयोग एकाएकीं जमणार नाहीं. मात्र पुढील नियम तुम्ही लक्षांत ठेवला तर कांहीं सेकंदांत तुम्ही एकाव्यतिरिक्त सर्व बिंदू छेदाल.तो नियम म्हणजे आपण जेथून सुरवात

केली असेल तो बिंदु पाठोपाठ छेदावयाचा. उदा. प्रथम आपण एक, दोन, तीन म्हणून नं. ७ पासून सुरुवात करून नं. ३ च्या बिंदूवर फुली करूं. नंतर आपण ज्या नंबर ७ च्या बिंदूपासून सुरुवात केली तो बिंदू नं. ५ पासून सुरुवात करून छेदावयाचा. याप्रमाणें सर्व बिंदु छेदतां येतात. बिंदूवर नंबर समजण्याकरितां दिले आहेत. प्रत्यक्ष प्रयोगाच्या वेळीं नंबर देऊं नयेत. एक दोन वेळा प्रयोग करून पाहिल्यास सर्व कांहीं चटकन लक्षांत येईल. चांदणी काढणेंहि अवघड नाहीं. थोड्या संवयीनें काढतां येते. कुठली रेषा कुठें गेली आहे हें लक्षांत ठेऊन चांदणी काढण्याची संवय करावी.

## प्रयोग नं. १७:—भांडें गरम करणें

जादूगार एक आल्युमिनियमचा ग्लास प्रेक्षकांपैकीं एकाचे जवळ देतो व त्याकडे रोखून पाहतांच तो गरम होतो. ग्लास इतका गरम होतो कीं प्रेक्षक तो हातांतहि धरूं शकत नाहीं. नंतर जादूगार त्यांतून मिठाई काढतो.

**साहित्य व तयारी :**—एकाच आकारांचे दोन आल्युमिनीयमचे ग्लास. एकांत थोडी मिठाई घालून त्याचे तोंडावर काळा कागद बांधून टेबलावर तयार ठेवावा. नंतर दुसरा ग्लास प्रेक्षकांना दाखवून तो साधा असल्याची खात्री करुन घेण्यास सांगावें. ' परंतु हा ग्लास पाहिजे तितका स्वच्छ नाहीं म्हणून जरा साफ करुन घेतों ' असें म्हणावें. ग्लासांत थोडें पाणी व स्टेजजवळची थोडी माती टाकावी. ( मातीत Hgcl 2 किंवा ज्याला हिंदींत दालचिकना म्हणतात, ती पूड थोड्या प्रमाणांत मिसळलेली असावी. हें औषध राखेप्रमाणें दिसतें. तें विषारी आहे व विषारी औषधांच्या दुकानांत मिळतें किंवा

शाळेच्या प्रयोगशाळेंतहि असतें. इंग्रजींत त्याला मर्क्युरीक्लोराईड म्हणतात.) माती टाकून झाल्यावर ग्लासांत पाणी घालून थोडे घासावेत. नंतर भरपूर पाण्यानें विसळून व ग्लासाचे तोंडावर काळा कागद बांधून तो प्रेक्षकाजवळ द्यावा. थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारुन ग्लासावरुन जादूची कांडी फिरवावी. नजर रोखून पाहूं लागावें. ग्लास गरम होऊं लागेल. ग्लास इतका गरम होईल कीं, प्रेक्षक तो फेकून देतील. तुम्ही तो ग्लास घेऊन ४।५ प्रेक्षकांना दाखवा. जादूची कांठी घेण्याच्या निमित्तानें स्टेजवर येऊन कांठी उचलतांना गरम ग्लास ठेऊन अगोदर मिठाई भरलेला ग्लास उचला. प्रेक्षकांसमोर येऊन म्हणा कीं, हा जो गरम ग्लास आहे (ग्लास गरम असल्याचा अभिनय करा) त्याच्यावर जादूची कांडी फिरवितांच आपणास काय मिळतें तें पाहूं. नंतर वरचा कागद फाडून आंतील मिठाई काढून प्रेक्षकांतील लहान मुलांना द्या. एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवा कीं, ह्या प्रयोगानंतर हात स्वच्छ धुवा. कारण ते डोळ्यांना लावतां कामा नयेत.

सदर प्रयोगाचें भाषण आपण आपल्या आवडीप्रमाणें तयार करावें. भुतांचें वरदान किंवा डोळ्यांची अचाट शक्ती असें कांहीं तरी नांव देऊन प्रयोगास सुरवात करावी.

## प्रयोग नं. १८:—अंतर्ज्ञानानें दुसऱ्याचे मनांतील प्रश्न ओळखणें

जादूगार प्रेक्षकांना कागदाचे दहा बारा तुकडे देतो व तितकींच पाकिटें देतो. कागदावर एकेक प्रश्न सुवाच्य भाषेंत लिहून तो कागद पाकिटांत बंद करण्यास सांगतो. सर्व पाकिटें गोळा करुन प्रेक्षकांसमोर स्टुलावर ठेवतो. एक पाकीट उचलून तें कपाळाला लाऊन

आंतील प्रश्न बरोबर सांगतो. सर्वांचे प्रश्न बरोबर आलेले पाहून प्रेक्षक थक्क होतात.

**साहित्य व तयारीः**—कोऱ्या कागदाचे [redacted] दहा तुकडे व तितकींच पाकीटें.

या प्रयोगांत साथिदारांची आवश्यकता आहे. साथिदार कोणता प्रश्न लिहिणार आहे हें आपणास माहीत असण्यास हवें. त्याचप्रमाणें प्रश्न लिहितांना साथीदारानें आपल्या पाकीटावर एक बारीकशी खूण करुन ठेवण्यास हवी. आतां आपणांस साथिदाराचें पाकीट व त्यानें लिहिलेला प्रश्न माहीत झाला. त्यानंतर ज्या वेळीं जादूगार सर्व पाकीटें गोळा करुन स्टुलावर ठेवतो त्या वेळीं तो साथिदाराचें पाकीट सर्वांत खालीं ठेवतो. प्रथम वरचें एक पाकीट उचलून कपाळास लावतो व थोडा वेळ एकाग्रता करुन साथिदाराचा प्रश्न वाचतो व हा कोणाचा प्रश्न आहे असें विचारतांच साथिदार हात वर करतो. वाचलेला प्रश्न बरोबर आहे कीं नाहीं हें पाहण्याच्या निमित्तानें जादूगार पाकीट फोडून प्रश्न पाहातो. मी जो वाचला तोच प्रश्न आहे असें म्हणतो. खरें पाहिलें असतां या वेळीं जादूगारास दुसरा प्रश्न समजलेला असतो. नंतर दुसरें पाकीट घेऊन पहिल्या-प्रमाणें कपाळाला लाऊन व थोडा वेळ थांबून अगोदर समजलेला प्रश्न वाचतो. नंतर पाकीट फोडून प्रश्न बरोबर असल्याची खात्री करुन घेतो. याप्रमाणें सर्व प्रश्न कसे वाचतां येतील याची कल्पना आपणास आली असेल. सर्व प्रश्न वाचून झाल्यावर प्रेक्षकांतील एका माणसाला बोलावून प्रश्न पुन्हा वाचण्यास

सांगावें. ते बरोबर आहेत कीं नाहीं ते विचारावे. हा प्रयोग फारच चांगला आहे. मात्र दोन तीन गोष्टींची खबरदारी घेण्यास हवी. पहिली गोष्ट म्हणजे साथीदार चांगला हवा. त्यानें प्रश्न लिहितांना बाजूच्या एकाद्या माणसाला दाखवून लिहिण्यास हवें, म्हणजे प्रयोगाला रंग चढतो. त्याचप्रमाणें प्रेक्षकांच्या प्रश्नाला गोड भाषेंत उत्तरें द्यावींत. हा प्रयोग चालू असतां चेहरा गंभीर ठेवावा. एकादा महान प्रयोग करतों आहोंत असें भासवावें. प्रेक्षकांना सुवाच्य अक्षरांत व आपणांस समजणाऱ्या भाषेंत प्रश्न लिहिण्यास सांगावें. कागदाची फक्त एक घडी करण्यास सांगावें. एक घडी केल्यामुळें सर्वांचे कागद सारख्या आकाराचे दिसतील. एकदोनदां प्रयोग केल्यावर लोकांना हा प्रयोग किती आवडतो याची कल्पना येईल.

## प्रयोग नं. १९:—पंधरा काड्या

जादूगार आगपेटींत १५ काड्या टेबलावर ठेवतो व समोरच्या माणसाला म्हणतो कीं आपण प्रत्येकानें एकाच वेळीं एक, दोन अगर तीन काड्या आलटून पालटून उचलूं. जो कोणी शेवटची एक काडी उचलील तो हरला. ( आपल्या मित्रानें कितीहि प्रयत्न केला तरी तो जिंकणार नाहीं. )

**साहित्य व तयारी**:—याला साहित्य म्हणजे फक्त आगपेटीच्या १५ काड्या. हा प्रयोग टेबलावर बसल्या बसल्या करून दाखविण्यासारखा आहे. स्टेजवर करावयाचा नाहीं. दिसण्यांत साध्या दिसणाऱ्या या प्रयोगाचे साहाय्यानें आपण हुषार अशा गणितबहादरासहि हरवूं शकाल. १५ काड्या टेबलावर ठेवल्यानंतर प्रथम

कोणीहि काड्या उचलल्या तरी चालतील. वर सांगितल्याप्रमाणें प्रत्येक वेळीं कमींत कमी एक व जास्तीत जास्त तीन काड्या उचलण्याची परवानगी आहे. या काड्या एकदां तुम्ही, तर नंतर तुमच्या मित्रानें व परत तुम्ही. याप्रमाणें उचलावयाच्या आहेत, हेंहि लक्षांत असूं द्यावें.

तसें पाहिलें तर हा प्रयोग फार सोपा आहे. तुम्ही काड्या उचलून झाल्यावर टेबलावर ९ व नंतर ५ काड्या शिल्लक राहतील याची खबरदारी घ्या म्हणजे झालें. उदा. १५ काड्यांपैकीं तुमच्या मित्रानें ३ काड्या उचलल्या. टेबलावर १२ काड्या शिल्लक राहिल्या. आतां तुमची पाळी आहे तेव्हां तुम्हीहि ३ उचला म्हणजे खालीं ९ राहतील. ९ पैकीं तुमच्या मित्रानें फक्त १ च उचलली तर शिल्लक ८ राहतील. आपणांस टेबलावर ५ शिल्लक ठेवावयाच्या आहेत. म्हणून परताहि ३ च उचलण्यास हव्यात. आतां तुमच्या मित्रानें कितीहि उचलल्या तरी तुम्ही जिंकाल. समजा ३ उचलल्या तर शिल्लक २ राहतील. त्यांतली तुम्ही एक उचला म्हणजे शेवटची एक तुमच्या मित्राला उचलून हार खावी लागेल.

फक्त २।३ वेळां संवय करा म्हणजे हा प्रयोग आपल्या हातचा मळ होऊन बसेल. ९ व ५ हे नंबर मात्र लक्षांत असूं द्या.

## प्रयोग नं. २०:–राक्षसी शक्ति

जादूगार प्रेक्षकांतील एका ताकतवान माणसाला बोलावून चित्रांत दाखविल्याप्रमाणें रेटण्यास सांगतो. पण प्रेक्षक अनेक वेळां प्रयत्न करूनहि यशस्वी होऊं शकत नाहीं.

**साहित्य व तयारीः**–या प्रयोगाला काठीशिवाय कोणत्याहि



साहित्याची आवश्यकता नाहीं. माझ्या ओळखींत एक किड-किडीत गृहस्थ हा प्रयोग इतक्या सफाईनें करीत असत कीं लोकांना वाटे, या गृहस्थाला नक्कीच वेताळ प्रसन्न असला पाहिजे. नाहीं तर दुसरा इतका ताकतवान मनुष्य कसा हार खाईल ? पण खरें सांगावयाचें म्हणजे हा एक शास्त्रीय प्रयोग आहे. चित्राकडे पहा म्हणजे लक्षात येईल कीं जादूगारानें काठी मध्यभागीं धरली आहे व ढकलणाऱ्या माणसानें ती दोन्ही टोकांना धरली आहे. दोन्ही टोकांना धरून रेटल्यामुळें ढकलणाऱ्याच्या शक्तीचा परिणाम जादूगारावर कांहींच होत नाहीं व ढकलणारा मात्र कष्ट करून दमून जातो. आपणहि प्रयोग करुन पहा म्हणजे दुसऱ्याची शक्ती कशी वाया जाते याची कल्पना येईल. दोन गोष्टी लक्षांत ठेवा. जादूगारानें आपले हात काठीच्या मध्यभागीं धरुन ढकलणारास बाजूला धरण्यास सांगावें. त्याचप्रमाणें जादूगारानें उभें राहतांना पायांत अंतर ठेवून हात समोर ताठ ठेवावेत. इतर प्रयोगांप्रमाणें याही प्रयोगाची संवय करण्यास हवी. एकदम स्टेजवर जाऊन प्रयोग करुं नये. संवयीनें कसें उभें रहावें व हात कसे ठेवावेत याची व्यवस्थित कल्पना येईल आणि मग आपण मोठमोठ्या पैलवानांनाहि हरवूं शकाल.

---

**थोडक्यांत भाषण:**—जादूगार पैलवान नसला तरी कांहीं गुप्त शक्ति त्याला मदत करीत असते असें लोक म्हणतात. तें अगदींच खोटें नाहीं. नमुना म्हणून मी एक छोटा प्रयोग करुन दाखवितों. मला एका धडधाकट माणसाची आवश्यकता आहे. हं, आपण या, असें म्हणून एखाद्या धडधाकट माणसाकडे बोट दाखवून बोलवावें व प्रयोगाला सुरवात करावी.

## प्रयोग नं. २१:–टेबल अधांतरीं करणें.

स्टेजवरचें टेबल चारी बाजूला चार माणसांनीं हात ठेवले असतां आपोआप हलूं लागतें व अधांतरीं होतें.

**साहित्य व तयारी:**—एक टेबल व चार प्रेक्षक स्टेजवर असले कीं हा प्रयोग होऊं शकतो. या प्रयोगाची स्तुति आपण अनेकांच्या तोंडून ऐकली असेल.

अमुक माणसानें टेबल अधांतरीं केलें व तमुक माणसानें टेबल गरागरा फिरविलें असें लोक बोलतात आणि आज तोच प्रयोग आपण करणार आहांत.

स्टेजवर मध्यभागीं टेबल घेऊन चार प्रेक्षकांना चारी बाजूस उभें राहण्यास सांगा. नंतर प्रत्येकास टेबलावर फक्त दोन्ही हातांचे पंजे पालथे ठेवण्यास सांगा. हे पंजे असे ठेवले जावेत कीं चार बोटें टेबलावर व आंगठा टेबलाचे कडेच्या खालीं. नंतर त्या चौघांना वरती बघण्यास सांगून कशावर तरी एकाग्रता करण्यास सांगा व म्हणा कीं **टेबल हलूं लागल्यास अगर वर जाऊं लागल्यास त्याला विरोध करूं नका** आणि आश्चर्य म्हणजे कांहीं क्षणांत टेबल गोल फिरुं लागेल व नंतर थोडें अधांतरीं होईल.

या प्रयोगाचें गुपीत म्हणजे टेबलाजवळ उभ्या असलेल्या चार माणसांत आपला एक साथिदार असतो व तो हलकेंच टेबल फिरवूं लागतो. बाकीच्या लोकांना आपण अगोदरच विरोध करुं नका असें सांगितल्यामुळें सर्वजण टेबलाबरोबर फिरुं लागतात. टेबल वर उचलूं लागतांच ते वर उचलतात. सर्वजण वर बघत असल्यामुळें जवळच्या लोकांना कांहींच कल्पना येत नाहीं. परंतु प्रेक्षक मात्र तोंड भरुन जादूगाराचें कौतुक करीत असतात.

**थोडक्यांत भाषणः**—आतां मी जो प्रयोग करणार आहें तो प्रयोग पूर्वी इजिप्तचे लोक करीत असत. आपल्याकडे कांहीं मुसलमान फकीर करीत. हा प्रयोग जंगलांत हिंडत असतां एका फकिराकडून मला शिकण्यास मिळाला. तो दर वेळीं यशस्वी होईलच असें सांगतां येत नाहीं; कारण त्याला ठराविक वातावरणाची आवश्यकता असते. सजीव प्राण्यांपेक्षां निर्जीव वस्तूंवर प्रयोग करणें फार अवघड व तेंच मी दाखविण्याचा प्रयत्न करणार आहें. या प्रयोगाला प्लँचेट असेंहि म्हणतात.

## प्रयोग नं. २२:—उलटा पत्ता

कॅटमधील कोणताहि पत्ता प्रेक्षकांनीं घेऊन तो परत कॅटमध्यें घातला असतां आपोआप उलटा होतो.

**साहित्य व तयारीः**—एक साधा पत्त्यांचा कॅट.

या पुस्तकांत पत्त्याचा एकहि प्रयोग नाहीं म्हणून हा नाविन्यपूर्ण प्रयोग देत आहें. करण्यास सोपा पण कोणालाहि थक्क करणारा असा हा प्रयोग आहे. सुरुवातीला कॅटचे तळाशीं एक पत्ता उलटा करून ठेवा व

वरवर पिसून प्रेक्षकांना कोणताहि एक पत्ता घेण्यास सांगा. तो पाहण्यास सांगा. प्रेक्षक पत्ता पहात असतांना कॅट बंद करून हळूंच उलटा करा व हातांत घट्ट धरा. नंतर प्रेक्षकांस सांगा कीं; आपणांस पाहिजे तेथें आपला पत्ता आंत घुसवा. लक्षांत ठेवा, प्रेक्षक ज्या वेळीं पत्ता आंत ढकलीत असेल त्या वेळीं पत्त्यांचा कॅट घट्ट धरलेला असावा. नाहींतर त्यांना सर्व पत्ते सुलटे दिसतील. कॅटमध्यें पत्ता पूर्णपणें गेला आहे याची खात्री होतांच कॅट मागें नेऊन प्रथम उलटा करून ठेवलेला एक पत्ता सुलटा करा. कॅट प्रेक्षकांसमोर ठेवा व त्यांना कॅटवर एकाग्रता करण्यास सांगा. त्यांना सांगा कीं, आपण आपल्या पत्त्यावर एकाग्रता केल्यावर तो आपोआप उलटा होईल व नंतर त्यांना कॅटमधले पत्ते एका बोटानें सरकवण्यास सांगा. नेमका त्याचाच पत्ता उलटा झालेला दिसेल. थोड्या संवयीनें हा प्रयोग अगदीं सहज करतां येतो.

## प्रयोग नं. २३:—ग्लास गुप्त करणें

एक काचेचा ग्लास घेऊन तो कागदांत गुंडाळून डाव्या हातांत धरून उजव्या हातानें कागदावर थाप मारताच ग्लास नाहींसा होतो.

**साहित्य व तयारी**:—या प्रयोगाला एक काचेचा ग्लास, एक कागद व शक्य असल्यास चित्रांत दाखविल्याप्रमाणें मध्य-भागीं भोंक असलेलें लहान टेबल किंवा लहान मोकळें खोकें.



प्रेक्षकांना कोणतीहि गोष्ट

नाहींशी झालेली पाहून गम्मत वाटते. मग कांचेचा ग्लास नाहींसा झालेला पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय कसें राहील ? हा प्रयोग पाहणाराला थक्क करणारा असला तरी करण्यास सोपा आहे.

प्रथम एक काचेचा ग्लास घेऊन तो प्रेक्षकांस दाखवा



व नंतर त्यावर एक कागद घालून त्यांत ग्लास गुंडाळा. कागद आपण भांड्यावर झाकण घालतों, तसा घालून खालच्या बाजूला जरा दाबा. नंतर टेबलावर जें रिकामें खोकें आपण ठेवलें असेल (खोक्यांत थोडें कापड घालून ठेवा. म्हणजे ग्लास आंत सोडल्यानंतर आवाज येणार नाहीं) त्यावर ग्लाससकट कागद धरून ग्लासाच्या तोंडावरचा हात जरा सैल करा; म्हणजे ग्लास आपोआप खोक्यांत पडेल.

कागदाला आपण अगोदर दाबलें असल्यामुळें ग्लासासारखा आकार आलेला असेल. नंतर चटकन तसाच कागद घेऊन स्टेजवर पुढें या. या वेळीं कागदाचे खालच्या बाजूस हात ठेवण्यास विसरूं नये. नाहातर कागद रिकामा असल्याचें प्रेक्षकांना दिसेल. नंतर एक, दोन, तीन म्हणून वरचा हात कागदावर जोरानें मारा. ग्लास नाहींसा झाल्याचें प्रेक्षकांना दिसेल. या प्रयोगाकरतां चित्रांत दाखविल्याप्रमाणें मध्यभागीं भोंक व भोंकाचे खालीं कापडी पिशवी असलेलें लहान टेबल वापरण्यास हरकत नाहीं. तें सोपें जातें; परंतु टेबलाची नेआण करणें कठीण असतें. म्हणून साधें खोकें वापरलें तरी चालेल. खोक्यांत कापूस अगर कापड घालण्यास विसरूं नये.

---

**थोडक्यांत भाषण:**——जादूगार जशा अनेक गोष्टी उत्पन्न करतो तशा कांहीं गोष्टी तो नाहींशाहि करूं शकतो. आतां हा कांचेचा ग्लास पहा ना. मी तो नाहींसा करणार आहें; पण त्याअगोदर तो काचेचा आहे कीं नाहीं याची खात्री करून घ्या.

## प्रयोग नं. २४:–खडूची करामत

जादूगार प्रेक्षकांपैकीं एकास टेबलावर खडूचा बिंदू अगर ठिपका काढण्यास सांगतो. नंतर आपला डावा हात प्रेक्षकांसमक्ष साफ करून टेबलाखालीं धरतो व उजव्या तळहातानें खडूच्या ठिपक्यावर थाप मारतो. थाप मारतांच खडूचा बिंदू टेबलाखालच्या हातावर उमटलेला दिसतो.

**साहित्य व तयारी:**——मित्रमंडळींच्या बैठकींत करण्यासारखे जे कांहीं प्रयोग आहेत त्यांतला हा एक महत्त्वाचा प्रयोग आहे. फक्त एका खडूशिवाय कसल्याच साहित्याची आवश्यकता नाहीं. टेबल, स्टूल अगर खुर्ची यांपैकीं कांहींहि चालतें. याचें गुपीत मात्र मजेशीर आहे. आपण आपल्या खिशांत नेहमीं पांढऱ्या खडूचे एक-दोन तुकडे ठेवावेत. प्रथम लोकांजवळ खडूची मागणी करावी. त्यांच्याजवळ खडू मिळाल्यास प्रयोगाला चांगलाच उठाव येतो; पण जर खडू मिळाला नाहीं तर आपण आपल्या खिशांतला द्यावा. जादूगारानें या प्रयोगासाठीं पूर्वतयारी म्हणजे आपल्या डाव्या हाताच्या मधल्या बोटाच्या **नखाला** मध्यभागीं थोडा खडू लाऊन ठेवावा. जादूगार जेव्हां तळहात दाखवितो तेव्हां मागच्या नखावरचा ठिपका कोणास दिसत नाहीं; डावा हात टेबला-

खालीं नेल्यावर चटकन् मधलें बोट वाकवून त्याचें नख अंगठ्याखालच्या उंचवट्यावर घासावें (हें सहज जमतें) व नंतर हात पसरून खालीं तसाच ठेवावा. टेबलावरच्या बिंदूवर उजव्या हातानें थाप दिल्यावर उजवा हात न उचलतां अगोदर डावा हात बाहेर काढावा व ठिपका आरपार गेल्याचें दाखवावें. नंतर उजवा हात उचलावा. मित्र थक्क होऊन जातील. आपण हा प्रयोग करून पहा म्हणजे मित्र कसे चकित होतात याची कल्पना येईल. **मात्र लक्षांत ठेवा कीं, एक प्रयोग पुन्हा पुन्हा दाखवावयाचा नसतो. त्यामुळें गुपित तर फुटण्याचा संभव असतोच; पण प्रयोगाबद्दलचें आकर्षणहि कमी होतें.**

या प्रयोगाला भाषणाची विशेष आवश्यकता नाहीं म्हणून तें दिलें नाहीं; परंतु 'क्ष' किरण जसे कशांतूनहि आरपार जाऊं शकतात तसा खडूचा ठिपका कसा जातो याचें एक प्रात्यक्षिक मी देणार आहें, असें लोकांना सांगावें. (माझा असा अनुभव आहे कीं हा प्रयोग पुन्हा पुन्हा करण्याविषयीं मित्र नेहमीं आग्रह करतात; पण पुन्हा दाखविण्याचा मोह आवरावयास हवा.)

## प्रयोग नं. २५ :—ग्लास अधांतरीं करणें

जादूगार एक पुठ्ठा प्रेक्षकांना दाखवितो व त्यावर दोन कांचेचे अगर आल्युमिनियमचे ग्लास ठेवून पुठ्ठा उचलून तो हलके हलके उलटा करतो. पुठ्ठा संपूर्ण उलटा केला तरी ग्लास न पडतां पुठ्ठ्याला चिकटून बसलेले दिसतात.

---

**साहित्य व तयारीः**—एक कागदी जाड पुठ्ठा, दोन कांचेचे अगर आल्युमिनियमचे ग्लास व चित्र नं. १ मध्यें दाखविल्याप्रमाणें एक जाड पत्र्याची क्लीप. ही क्लीप आंगठ्याचे टोकावर सैल बसण्यास हवी. क्लिपच्या पत्र्याची रुंदी पाव इंचापेक्षा थोडी कमी असावी.



चित्र नंबर १

प्रथम प्रेक्षकांना पुठ्ठा दाखवा व तो टेबलावर ठेवा. नंतर प्रेक्षकांना दाखविण्याकरतां ग्लास घ्या. मात्र या वेळीं टेबलावर ठेवलेली क्लीप पुठ्ठयावर उताणी ठेवावी. ग्लास प्रेक्षकांना दाखवून झाल्यावर क्लीपमध्यें अंगठयाचा शेंडा ठेऊन पुठ्ठा उचलावा व दोन्ही ग्लास आंगठ्याचे दोन्ही बाजूस ठेवावे. क्लीप व अंगठा यामध्यें प्रत्येक ग्लास अडकण्यास हवा (चित्र नं. २ पहा). प्रेक्षकांना क्लीपची कल्पना येत नाहीं. अंगठा व क्लीप यामध्यें ग्लास घट्ट बसले असल्यामुळें कसेहि उलटे पालटे केले तरी ते पडणार नाहींत; परंतु इतकें असलें तरी हा प्रयोग सावकाश करावा व ग्लास पडतात कीं काय असें भासवावें. प्रयोग झाल्यावर प्रथम एक ग्लास उचलावा. नंतर दुसरा ग्लास उचलतांना क्लीप घट्ट धरावी व पुठ्ठा टेबलावर ठेवतांना ती टेबलावर ठेवावी. याहि प्रयोगाला घरीं संवय करण्यास हवी.



चित्र नं. २

**थोडक्यांत भाषणः**—ग्लासासारख्या निर्जीव पदार्थावर इच्छाशक्तीचा परिणाम कसा होतो याची प्रेक्षकांना कल्पना यावी म्हणून मी हा प्रयोग करीत आहें.

## समारोप

पुस्तकांत निवेदन केलेले पंचवीस प्रयोग वाचून जादूशीं संबंध नसलेल्या वाचकांना वाटेल, 'अरे, जादू म्हणजे निव्वळ फसवा-फसवी, ढोंग आहे!' मित्रांनो, आपलें हें म्हणणें वरवर खरें वाटण्या सारखें असलें तरी तें खरें नाहीं; कारण ज्या वेळीं प्रेक्षक जादूचे प्रयोग पाहण्यास जातात त्या वेळीं जादूगारानें आपणास उत्तम प्रकारें फसवावें अशीच त्यांची समजूत असते व एकादा जादूगार लोकांना फसवूं शकला नाहीं तर प्रेक्षक चटकन् उद्‌गारतात कीं, अजून पाहिजे तितकी सफाई आली नाहीं; आणि म्हणूनच जादूगारांस प्रेक्षकांना उत्तम प्रकारें फसवितां आलें पाहिजे. मात्र एक गोष्ट लक्षांत ठेवा. जादूगार हा स्टेजवर फसवणारा राहण्यास हवा; कारण तो जर दैनंदिन व्यवहारांत लोकांना फसवूं लागला तर त्यानें नागरिकत्वाचें कर्तव्य केलें नाहीं असेंच म्हणावें लागेल. जादूगारानें आपलें वर्तन अगदीं चोख ठेवण्यास हवें. व्यवहारांत त्यानें सभ्य नागरिक म्हणून वावरलें पाहिजे; म्हणजे जादूविद्येची खरी सेवा केली असें होईल. असो. पुस्तकांतील प्रयोग सोपे करून लिहिले आहेत. तरीहि एकादा प्रयोग आपणास कदाचित समजणार नाहीं. तो २-३ वेळां वाचल्यास निश्चित समजेल; परंतु आपल्या काहीं शंका असतील तर मला हक्कानें लिहा. आपल्या शंका दूर करण्याचा मी अवश्य प्रयत्न करीन. प्रयोगाच्या आरंभीं जीं भाषणें दिलीं आहेत ती प्रसंगा-नुरूप जादूगारानें बदलून चटकदार करण्याचा प्रयत्न करावा.

हें पुस्तक लिहिण्यास अनेक इंग्लिश व मराठी पुस्तकांची मदत झाली. त्यांच्या लेखकांचा मी ऋणी आहें.

भारतीय जादूची शाळा,
१९२३ सदाशिव,
माडीवाले कॉलनी पुणें २.

जादूगार रघुवीर

## किर्लोस्कर मासिकाचे संपादक लिहितात

"....आपल्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति इतक्या अल्पावधींत निघत आहे, ही एकच गोष्ट या पुस्तकानें मराठी वाचकांचीं मनें किती चटकन् आकर्षित केलीं आहेत हें सिद्ध करण्यास पुरेशी आहे. प्रवासवर्णन म्हणजे केवळ नद्या, पर्वत, प्रेक्षणीय स्थळें यांचा तपशील नव्हे. प्रवासाला निघणाऱ्या व्यक्तीला आलेले अनुभव व भिन्न भिन्न स्थळें, निसर्गदृश्यें, व्यक्ती, समाज यांची त्यांच्या मनावर झालेली प्रतिक्रिया यांच्या वर्णनानेंच कोणत्याहि प्रवासवृत्तांत खरा जिवंतपणा येतो. आपल्या पुस्तकाच्या यशाचें हेंच रहस्य आहे. आपलें प्रवासवर्णन वाचून अनेक हिंदी तरुणांना प्रवास करण्याची गोडी समजेल व प्रवास करण्याची आवड महाराष्ट्रांत वाढीस लागेल अशी खात्री आहे."

* *

**रविवार सकाळ, पुणें—**

"प्रवास, अनुभवांचा सांठा आणि मार्मिक निरीक्षणाची जोड मिळाल्यामुळें श्री. रघुवीर यांच्या लेखणींतून जिवंत प्रवासवर्णन उतरलें आहे, याची साक्ष हें पुस्तक वाचीत असतांना पानोपानीं येते. शब्दांचें अवडंबर न माजवितां विचार मांडण्याची शैली त्यांना इतकी सहज साधली आहे कीं पुस्तकाचीं दोनचार पानें वाचलीं कीं त्याच्यापुढें काय, अशी उत्सुकता वाचकांच्या मनांत आपोआप उत्पन्न होते. या पुस्तकाच्या वाचनानें आपणहि प्रवासाला निघावें व जग पाहून यावें अशी उर्मी अनेकांत निर्माण झाल्यास नवल नाहीं."

* *

**लोकसत्ता, मुंबई—**

हिंदी माणूस जात्याच प्रवासाला नाखूष असतो. अशा स्थितींत श्री. रघुवीर यांनीं १८ देश पायाखालीं घालावे हें खचितच अभिनंदनीय आहे. या प्रवासाचें फळ म्हणजेच हें पुस्तक होय.

प्रत्येक देशांत सामान्य लोकांत राहून तेथील लोकजीवनाची लेखकांनीं जवळून पहाणी केली आहे. मधून मधून तेथील लोककथा, लोकांचे समज वगैरेची त्यांनीं माहिती दिली आहे. कोलंबोंतील चहा पिणारे हत्ती, केसांना इस्त्री करणाऱ्या आफ्रिकेंतील बायका, तेथील हलता पण न पडणारा दगड वगैरे अनेक प्रकारची माहिती अतिशय उद्‌बोधक आहे. पुस्तक आबालवृद्धांना प्रिय होईल.

* *

**साप्ताहिक मौज, मुंबई—** ता. १० एप्रिल १९५५

श्री. रघुवीर स्वतःच्या जबाबदारीवर पैशाचें फारसें पाठबळ नसतांहि इंग्लंडला व अलीकडे जपानला जाऊन आले. अत्यंत गरिबींतून वर आलेल्या या तरुणाचें एकमेव धन म्हणजे त्याचा चौकस स्वभाव. त्यामुळें केवळ जादूच्या राज्यांत मुलूखगिरी करून रघुवीर थांबले नाहींत. ते गेले तेथें धडाडीनें काळ्या, गोऱ्या, पिवळ्या लोकांत मिसळले. बाजारपेठेपासून तों जंगल-शेतापर्यंत हिंडून परक्या लोकांच्या बरोबरीनें काम करून त्यांनीं त्यांच्या भाषा, चालीरीती आणि दैनंदिन जीवनांतील लकबा आत्मसात केल्या. केवळ प्रवाशापुढेंच नव्हे, तर भूगोलाचे कंटाळवाणे धडे अभ्यासणाऱ्या विद्यार्थ्यांपुढेंहि असलीं प्रवासवर्णनें अनेक दृष्टया आदर्श म्हणून ठेवलीं जावींत.

* *

दैनिक भारत, पुणें-- ता. १ जानेवारी १९५५

या पुस्तकांत आफ्रिका, युरोप आणि जपानचा प्रवास अत्यंत मनोरंजकपणें लिहिला आहे. प्रवासांतील बारीक सारीक गमतींनीं पुस्तक वाचण्याची उत्कंठा वाढते. लेखकाची निरीक्षणशक्ति,प्रवासाची आवड, प्रत्येक गोष्टीबद्दल जिज्ञासा व कुतूहल यामुळें त्या त्या ठिकाणचे रीतीरिवाज, त्या लोकांच्या आवडी-निवडी, पेहराव वगैरे गोष्टी वाचकांना भूगोलाप्रमाणें क्लिष्ट न होतां मजेदार वाटतात. अशा चटकदार प्रवासवर्णनाचा आपल्याकडे अभाव आहे. यापुढें लेखकाचा रशियास जाण्याचा विचार आहे. 'प्रवासी जादूगार' प्रमाणें 'रशियांतील जादू' लवकरच वाचकांना वाचावयास मिळो. आपल्या देशांत राहून दुसऱ्या देशाची काल्पनिक सफर करण्यासाठीं आबाल-वृद्धांनीं हें पुस्तक जरूर वाचावें.

* *

सोलापूर समाचार, सोलापूर-- ता. १२ एप्रिल १९५५

जादूगार रघुवीरबरोबर आपण स्वतः प्रवासास निघालों आहोंत असें हें पुस्तक वाचतांना वाटतें आणि एक एक आठवण वाचीत वाचीत वाचक रंगून जातो. त्यामुळें पुस्तक केव्हां संपतें हें समजतहि नाहीं. परदेशांत पुष्कळजण जातात. पण अशा मनोरंजक माहितीचा संग्रह करून तो सोप्या भाषेंत वाचकांना उपलब्ध करून देणारे फारच थोडे. पुस्तकांतील छायाचित्रामुळें पुस्तकाच्या सौंदर्यांत भरच पडलेली आहे. प्रवासी जादूगार हें पुस्तक लिहिण्यापूर्वी घेतलेल्या परिश्रमांची झळ न लागतां पुस्तक वाचतांना वाचकांना स्वतः प्रवास

केल्याचें श्रेय लाभतें. म्हणून प्रत्येकानें या जादूगाराला आपल्याजवळ अवश्य बाळगावें.

* *

**अमृत**, जुलै १९५५ ( हें पुस्तक वाचलेंच पाहिजे, पान १९६, 'आमची निवड' या सदरांत )

प्रवासवर्णन वाचण्यासंबंधींची वाचकांची तहान हा 'प्रवासी जादूगार' भरपूर शमवील. पूर्व आफ्रिका, इंग्लंड, स्कॉटलंड, सिलोन, मलाया, जपान अशा त्रिखंड प्रवासाचें वर्णन केवळ मनोरंजक नसून माहितीपूर्ण व बोधप्रदहि आहे.

विशेषत: तरुणांनीं हें पुस्तक वाचावें. देशोदेशींची भौगोलिक, ऐतिहासिक, सामाजिक माहिती देणारीं दुसरीं अनेक पुस्तकें असूं शकतील; पण त्या पुस्तकांत असूं शकणार नाहीं व जिचें महत्त्व उत्कर्षेच्छु माणसाच्या दृष्टीनें मोठें आहे अशी एक गोष्ट या पुस्तकांत आहे. त्रिखंड संचार करणारे रघुवार हे कोणी शेठ-सावकार वा इनामदार–जहागिरदार नाहींत. ते पुण्याच्या अनाथ विद्यार्थि गृहाच्या आश्रयावर लहानाचे मोठे झाले आहेत. अर्थात मिजास म्हणन प्रवास करण्याइतकी संपन्नता त्यांना नव्हती, हे निराळें सांगावयास नको. पण त्यांच्यापाशी महत्त्वाकांक्षा, ज्ञानलालसा आणि कष्ट सोसण्याची तयारी असल्यामुळें त्याचें कोठें कांहीं अडूं शकलें नाहीं. हा प्रवासी जादूगार 'मला कसं जमणार' हा तरुणांच्या मनांतला बाऊ हुसकून लावील. 'केल्यानें होत आहे रे' या समर्थ-संदेशाचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे श्री. रघुवीर यांचें त्रिखंड भ्रमण.

श्री. रघुवीर हे नुसते जादूगार आणि धनुर्धर नाहींत; ते मार्मिक निरीक्षक आणि सफाईदार लेखकहि आहेत, याचा प्रत्यय वाचकाला आल्यावांचून राहाणार नाहीं.

* *

**दैनिक पुढारी, कोल्हापूर** ता. २२–७–५५

'प्रवासी जादूगार' हें पुस्तक इतक्या आकर्षक पद्धतीनें लिहिलें आहे कीं तें हातीं घेतल्यावर वाचून पुरें केल्याशिवाय खालीं ठेववत नाहीं. पुस्तकांत उत्कृष्ट छायाचित्रें समाविष्ट केल्यामुळें वाचलेला मजकूर वाचकांच्या मनांत ताबडतोब ठसतो. सदर पुस्तकामुळें अनेक तरुणांना प्रवासाची स्फूर्ति मिळेल असा आम्हांस विश्वास वाटतो. प्रत्येक महाराष्ट्रीयानें सदर पुस्तक आपल्या संग्रहीं ठेवावें इतकें तें चांगलें आहे. जादूगार रघुवीर यांनीं अशा प्रकारचीं आणखी पुस्तकें लिहून मराठी वाङ्मयांतील हें उपेक्षित दालन भरून काढावें.

* *

**दक्षिण विभाग स्त्री–संस्था संयुक्त समितीच्या अध्यक्ष लिहितात–**

मुंबई ता. २५ नोव्हेंबर १९५५

'प्रवासी जादूगार' हें पुस्तक वाचून मला अत्यंत आनंद झाला. 'प्रवासवर्णन लिहावें तर असें' असा सहजोद्गार वाचतां वाचतां माझ्या मुखांतून निघून गेला. अत्यंत सोप्या भाषेंत आणि मुलांनासुद्धां वाचण्यांत गोडी वाटावी, रस वाटावा अशा शुद्ध आणि सोप्या भाषेंत आपण जें प्रवासवर्णन लिहिलेंत तें मराठी भाषेंतील प्रवासवर्णनाच्या दालनांत आदर्श ठरेल अशी माझी खात्री आहे.

* *

## एक विद्यार्थी, एम. एम. हायस्कूल, उंबरगांव (जि. ठाणें) लिहितो–

ता. ३० मार्च १९५५

दहाव्या इयत्तेंत पहिला नंबर पटकावल्याबद्दल मला तुमचें 'प्रवासी जादूगार' हें पुस्तक मिळालें. तें मी संपूर्ण वाचलें. त्यांतील आपली वर्णन करण्याची पद्धत मला फार आवडली. खरोखर तीं प्रवासवर्णनें वाचल्यावर आपणच त्या वातावरणांत हिंडत आहोंत असा भास झाल्याखेरीज रहात नाहीं. मला हें पुस्तक मिळाल्यामुळें दोन फायदे झाले. ते म्हणजे एक जगप्रवासाचें आकर्षक असें वर्णन वाचावयास मिळालें व त्याबरोबरच कांहीं प्रसिद्ध स्थळांचीं, प्राण्यांचीं व माणसांचीं छायाचित्रें माझ्या संग्रहीं राहिलीं.

卐 卐



卐

# जादूचे आश्चर्यकारक तेरा प्रयोग

**सुधारून वाढविलेली आवृत्ति ५ वी**

किंमत फक्त ३१ नये पैसे



या पुस्तकाच्या साहाय्यानें आपण आपल्या मित्रांची **पाऊण तास** उत्तम प्रकारें करमणूक करूं शकाल.

सदर पुस्तकाच्या चार आवृत्या अल्पावधींतच संपल्या. पुस्तक उपयुक्त असल्याचें अनेक लोकांनीं कळविलें आहे. आपणहि आजच मागवा.

या पुस्तकांत कोणालाहि सहज समजतील असे जादूचे १३ प्रयोग जादूगार रघुवीर यांनीं सांगितले आहेत.

पुस्तकाची मागणी करतांना ६ आण्याचीं तिकिटें अगर मनीऑर्डर पाठवा.

पत्ताः—जादूगार रघुवीर
१९२३ सदाशिव पेठ, माडीवाले कॉलनी, पुणें २.

✦ भारतीय जादूच्या शाळेंत हे दोन्ही कोर्स

✦ यशाची हमी ! जादूगार रघुवीर

# कोर्स नं. १.

## ( सुरुवातीचा कोर्स )

**प्रवेश फी १ रु., संपूर्ण कोर्सची फी २५ रु.**

यांत आश्चर्यकारक असे दहा प्रयोग आणि त्यांचे साहित्य **मोफत दिलें जातें.** हे प्रयोग अर्धा ते पाऊण तास चालतात.

(१) **राक्षसी पत्ते:**–या चार मोठ्या पत्त्यांतील पंजाचे एक्के व शवटीं कोरीं पानें बनतात.

(२) **रुमालांतील काडी:**–रुमालांतील गुंडाळलेल्या काडीचे तुकडे केले असतां रुमाल उलगडतांच काडी पुन्हा जशीच्या तशीच बनते.

(३) **रायझिंग कार्डस्:**–प्रेक्षकांनीं घेतलेले पत्ते कॅटमधून आपोआप वरती येतात.

(४) **ग्लासांत टाकलेली अंगठी गुप्त होते:**–रिकाम्या ग्लासांत प्रेक्षकांदेखत टाकलेली अंगठी गुप्त होते.

(५) **रुमालाच्या गांठी:**–रुमालाला मारलेल्या गांठी आपोआप सुटतात.

(६) **अस्मानी दोऱ्या:**–दूर अंतरावर असलेल्या या दोन दोऱ्यांपैकीं एक दोरी ओढली कीं, दुसरीहि हलूं लागते व कमी जास्त होते.

(७) **रुमालाचें अंडें:**–पहातां पहातां रुमालाचें अंडें तयार होतें.

(८) **शाईचीं फुलें:**–ग्लासांत तयार केलेली शाई प्रेक्षकाच्या अंगावर फेकतांच फुलें तयार होतात.

(९) **रिकाम्या ग्लासांतून पाणी:**–रिकामा ग्लास प्रेक्षकांना दाखवून टेबलावर ठेवतांच तो पाण्यानें भरतो.

(१०) **कागदांतला रुमाल गुप्त करणें:**–कागदाच्या पुडींतला रुमाल जादूची कांडी फिरवितांच गुप्त होतो.